**फौजदारी प्रकरणातील न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने**
**करावयाच्या कार्यवाहीसंदर्भात सूचना**

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक, क्रमांक : वशिअ -१३१५/प्र.क्र.२७/११,
मंत्रालय, मुंबई - ४००० ०३२.
दिनांक: १४ सप्टेंबर, २०१५

## परिपत्रक

शासकीय कर्मचाऱ्याच्या वर्तनामुळे त्याच्यावर फौजदारी गुन्ह्याचा आरोप ठेवण्यात येऊन त्यात तो दोषी ठरला असेल व त्याला कोणतीही शिक्षा देय झाली असेल तर अशा प्रकरणी त्या कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील ) नियम, १९७९ च्या नियम १३ (एक) च्या तरतुदीन्वये कोणतीही चौकशी न करता शिक्षा देता येते. अशी शिक्षा देण्यापूर्वी त्यास शिक्षेबाबत अभिवेदन करण्याची संधी दिली जाऊ शकेल असेही त्या नियमाखालील परंतुकात स्पष्ट करण्यात आले आहे.

२. फौजदारी आरोपाखाली दोषी ठरलेल्या कर्मचाऱ्यांच्या प्रकरणात कशी कार्यवाही करावी याबाबतचे विवेचन विभागीय चौकशी नियमपुस्तिका, १९९१ च्या परिच्छेद- ४.६ मध्ये नमूद केले आहे. त्यानुसार, फौजदारी गुन्ह्यासाठी कर्मचारी न्यायालयात दोषी ठरला असेल तर त्याने अपील करण्याची मुदत संपेपर्यंत वाट न पाहता अथवा अपील केले असेल तर पहिल्या अपील न्यायालयाच्या निर्णयाची वाट न पाहता त्याला शिक्षा करता येते. अशा प्रकरणी समुचित शिक्षा देताना कोणत्या बाबी विचारात घ्याव्यात याबाबतचे मार्गदर्शन त्या परिच्छेदात करण्यात आले आहे.

३. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, नियमात/ नियमपुस्तिकेमध्ये वरीलप्रमाणे स्पष्ट तरतूद विहित केली असूनसुद्धा न्यायालयाने अपराधसिद्धी व शिक्षेसंबंधीचा न्यायनिर्णय दिल्यानंतरही वरील तरतुदींनुसार कर्मचाऱ्याच्या सेवासमाप्तीसंबंधी/ समुचित शिक्षा देण्यासंबंधीची कार्यवाही तातडीने केली जात नाही. तसेच कनिष्ठ न्यायालयाने दिलेल्या शिक्षादेशाविरुद्ध अपील न्यायालयात केलेल्या अपीलावरील अंतरिम आदेश विचारात घेऊन गैरवर्तणुकीसाठी शिक्षा देण्याची कार्यवाही प्रलंबित ठेवण्यात येते.

४. यासंदर्भात सर्व विभागांना आणि क्षेत्रिय कार्यालयांना आता पुनश्च पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:

अ) फौजदारी प्रकरणातील कर्मचाऱ्याशी संबंधित कार्यालयाने प्रत्येक सुनावणीच्या तारखेस न्यायालयात झालेल्या कार्यवाहीची माहिती घ्यावी व शासकीय वकिलांच्या संपर्कात राहून सुनावणीअंती न्यायालयाचे शिक्षादेश तात्काळ प्राप्त करुन घ्यावेत. सदर आदेशांची प्रत प्राप्त झाल्यावर, संबंधित कर्मचाऱ्याने अपील करण्याची मुदत संपण्याची अथवा अपील दाखल केले असल्यास अपील न्यायालयाच्या निर्णयाची वाट न पाहता, कनिष्ठ न्यायालयातील अपराधसिद्धी

विचारात घेऊन कर्मचाऱ्याच्या गैरवर्तनाच्या अनुषंगाने नियम १३ (एक) अनुसार त्यास शिक्षा देण्याची पुढील कार्यवाही करण्यासाठी प्रकरण तातडीने सक्षम प्राधिकाऱ्यास सादर करावे. सक्षम प्राधिकाऱ्यांनी शिक्षेचे आदेश विनाविलंब निर्गमित केले जातील याबाबत दक्षता घ्यावी. या कार्यवाहीत दिरंगाई झाल्यास त्याबाबतची जबाबदारी निश्चित करुन अशी दिरंगाई करणाऱ्या कर्मचाऱ्यांवर शिस्तभंगाची कारवाई करण्यात यावी. लाचलुचपत प्रतिबंधक अधिनियम, १९८८ मधील तरतुदींचा भंग केल्याप्रकरणी न्यायालयात अपराध सिद्ध झाला असल्यास अशा प्रकरणी सक्षम प्राधिकाऱ्याच्या शिक्षादेशाची प्रत तातडीने लाचलुचपत प्रतिबंधक विभागासही उपलब्ध करुन द्यावी.

ब) वरीलप्रमाणे शिस्तभंगाची कारवाई करण्यापूर्वीच अपील न्यायालयाचे अंतरिम आदेश प्राप्त झाल्यास आणि त्या आदेशात अपील न्यायालयाने कनिष्ठ न्यायालयाने दिलेल्या शिक्षेच्या केवळ अंमलबजावणीस (execution of sentence) स्थगिती दिली असेल तर अपील न्यायालयाच्या अंतिम आदेशांसाठी वाट न पाहता कनिष्ठ न्यायालयातील अपराधसिद्धी विचारात घेऊन गैरवर्तनासाठी वरील सेवारत कर्मचाऱ्यास नियम १३ (एक) अन्वये शिक्षा देण्याची कार्यवाही विनाविलंब पूर्ण करण्यात यावी. तसेच संबंधित कर्मचारी सेवानिवृत्त झाला असल्यास त्याला महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ च्या नियम २७ खालील तरतुदीत नमूद केल्यानुसार शिक्षा देण्याची कार्यवाही करण्यात यावी.

क) परंतु, अपील न्यायालयाने त्यांच्या अंतरिम आदेशात कनिष्ठ न्यायालयातील अपराधसिद्धीस (conviction) स्थगिती दिली असेल तर मूळात अपराधसिद्धी स्थगित होत असल्याने कनिष्ठ न्यायालयाच्या शिक्षादेशाच्या आधारे गैरवर्तनासाठी शिक्षा देण्याची कार्यवाही प्रलंबित ठेवावी व अपीलाचा अंतिम निर्णय लवकरात लवकर प्राप्त करुन घेण्यासाठी पाठपुरावा करावा. अपील न्यायालयाचा निर्णय प्राप्त झाल्यावर त्यानुसार पुढील कार्यवाही करावी.

५. हे परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०९१४१६२८४४१८०७ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.09.14 17:33:32 +05'30'

(डॉ.भगवान सहाय)
अपर मुख्य सचिव (सेवा)

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव,

२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

३. मुख्य सचिव,

४. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,

५. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक,

६. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

७. *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

८. *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,

९. *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

१०.*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

११.*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

१२.आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,

१३.सर्व मंत्रालयीन विभाग,

१४.मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख व कार्यालयप्रमुख,

१५.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती),

१६.विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती),

१७.सर्व विधीमंडळ सदस्य,

१८. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

१९. निवडनस्ती

* पत्राने